केंद्र शासनाच्या Foreign Training of Forestry Personnel (FTFP) कार्यक्रमांतर्गत वन विभागातील अधिकाऱ्यांच्या विदेशातील (इंडोनेशिया) प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- आयएफएस-५०१९/प्र.क्र.१६९/फ-७ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- १५ नोव्हेंबर, २०१९

<u>संदर्भ</u> :- १. केंद्र शासन, पर्यावरण वने व जलवायू परिवर्तन मंत्रालय, यांचे पत्र क्रं.एफ नं. १३- ८ / २०१९-आर टी दिनांक २४/१०/२०१९ व दि. १४/११/२०१९
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),यांचे पत्र क्रं. कक्ष-९/प्रशिक्षण/अंब्रेला-स्किम/ प्र.क्र.०१(१९-२०)/२२५१/१९-२०/ दिनांक ३१/१०/२०१९
३. शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, परदौ-१४१६/प्र.क्र.११/११ दिनांक २ जून २०१६
४. शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, परदौ-१४१४/प्र.क्र.४६/११ दिनांक २९ डिसेंबर २०१४

**<u>प्रस्तावना:-</u>**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन दिनांक २९/१२/२०१४ व दिनांक ०२/०६/२०१६ रोजीच्या परिपत्रकान्वये अखिल भारतीय सेवेतील, राज्यसेवेतील तसेच सार्वजनिक उपक्रम मंडळे, महामंडळे इ. चे अधिकारी, पदाधिकारी यांच्या विदेश दौऱ्याचे प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागामार्फत मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील शिफारस समितीसमोर सादर करण्यासाठी निकष विहीत करण्यात आले आहेत.

२. केंद्र शासनाच्या पर्यावरण, वने व जलवायू परिवर्तन मंत्रालय यांच्या दि. २४/१०/२०१९ व दि. १४/११/२०१९ रोजीच्या पत्रान्वये “Foreign Training of Forestry Personnel (FTFP)” अंतर्गत आयोजित करण्यात येत असलेल्या विविध प्रशिक्षण योजनांमध्ये वनसेवेतील अधिकाऱ्यांना प्रशिक्षण आयोजित करण्यात येत असल्याचे कळविले आहे. त्यानुसार दिनांक २२ नोव्हेंबर, २०१९ ते ३ डिसेंबर, २०१९ या कालावधीत **इंडोनेशिया** येथे होणाऱ्या **‘Wildlife Conservation and Management’** या विषयावरील दोन आठवड्यांच्या तसेच दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९ ते २० नोव्हेंबर, २०१९ व ५ डिसेंबर, २०१९ ते ६ डिसेंबर, २०१९ या कालावधीतील भारतातील प्रशिक्षण कार्यक्रम तयार केला असून सदर प्रशिक्षणाचा संपूर्ण खर्च (देशांतर्गत प्रवास खर्च वगळता) केंद्र शासनाच्या पर्यावरण, वने व जलवायू परिवर्तन मंत्रालयाकडून करण्यात येणार आहे.

३. त्यानुसार, नामनिर्देशित झालेल्या वनविभागातील (भावसे, आरएफओ) अधिकाऱ्यांना सदर विदेशातील प्रशिक्षणासाठी पाठविण्याच्या प्रस्तावास अनुसरुन संदर्भाधिन शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग दिनांक २९ डिसेंबर २०१४ व दिनांक ०२ जून २०१६ मधील तरतुदीनूसार सदर प्रस्तावास सामान्य प्रशासन विभागाच्या शिफारस समितीसोबत विभागाचे प्रभारी मंत्री व मा.राज्यपाल महोदयांची मान्यता घेण्यात आली आहे. दरम्यानच्या कालावधीत सदर प्रस्तावास Government of India, Ministry of External Affairs यांच्या दिनांक १३/११/२०१९ रोजीच्या

ईमेलव्दारे ना हरकत (Political Clearance) प्राप्त झालेला आहे. त्यास अनुसरुन दिनांक २२ नोव्हेंबर, २०१९ ते ३ डिसेंबर, २०१९ या कालावधीत **इंडोनेशिया** येथे होणाऱ्या **'Wildlife Conservation and Management'** या विषयावरील दोन आठवड्यांच्या तसेच दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९ ते २० नोव्हेंबर, २०१९ व ५ डिसेंबर, २०१९ ते ६ डिसेंबर, २०१९ या कालावधीतील भारतातील प्रशिक्षण कार्यक्रमांस नामनिर्देशित केलेल्या वनविभागातील अधिकाऱ्यांना उपस्थित राहण्याबाबत मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

केंद्र शासनाच्या पर्यावरण, वने व जलवायू परिवर्तन मंत्रालय यांच्या संदर्भाधिन दि. २४/१०/२०१९ रोजीच्या पत्रान्वये "Capacity Building in Forestry Sector" अंतर्गत आयोजित करण्यात येत असलेल्या विविध प्रशिक्षण योजनांमध्ये "Foreign Training of Forestry Personnel (FTFP)"अंतर्गत, दिनांक २१ नोव्हेंबर, २०१९ ते ४ डिसेंबर, २०१९ (प्रवासाच्या कालावधीसह) या कालावधीत **इंडोनेशिया** येथे होणाऱ्या **'Wildlife Conservation and Management'** या विषयावरील दोन आठवड्यांच्या तसेच दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९ ते २० नोव्हेंबर, २०१९ व ५ डिसेंबर, २०१९ ते ६ डिसेंबर, २०१९ या कालावधीतील भारतातील प्रशिक्षण कार्यक्रमाकरीता वनविभागातील नामनिर्देशित करण्यात आलेल्या खालील अधिकाऱ्यांना प्रशिक्षण दौऱ्यास उपस्थित राहण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १ | डॉ. जितेंद्र एस. रामगावकर, भावसे | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे |
| २ | श्री. रमेश गेनू देवखिळे | सहायक वनसंरक्षक, राहुरी, अहमदनगर वनविभाग |
| ३ | श्री. नितेश शंकर देवगडे | सहायक वनसंरक्षक, उपविभागीय वन अधिकारी, अलापल्ली |
| ४ | श्री. संतोष श्रीपती कंक | वनपरिक्षेत्र अधिकारी, ठाणे वन विभाग, ठाणे |

उपरोक्त अधिकाऱ्यांनी प्रशिक्षणावरुन परत आल्यावर त्यांच्या प्रशिक्षण कार्यक्रमासंबंधीचा विस्तृत अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९१११५१७३८१५५९१९ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a649866 31086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.11.16 12:17:07 +05'30'

**(वीरेंद्र तिवारी)**

**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. सहसचिव (कार्यासन फ-४/फ-८) , महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
७. उपसचिव (कार्यासन ११),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रशिक्षणांस नियुक्त केलेले संबंधित सर्व अधिकारी.
९. निवडनस्ती, कार्यासन फ-७ अ